महागाणपत्य महर्षी गृत्समद एकदंत चरित्र वर्णित होते. दैत्यराज प्रल्हाद भावपूर्ण रीतीने भक्तिपूर्वक श्रवण करीत होता. श्रीगृत्समद पुढे म्हणतात- देवतांना अशा स्वरूपात आश्वस्त करून भगवान श्रीएकदंत अन्तर्धान पावले.



इकडे मदासुराच्या विलासद नगरीत तो आपल्याच विलासात व्यग्र होता.

जय गजानन ५३

त्यावेळी एकदा अचानक त्याच्यासमोर देवर्षी नारद येऊन पोहोचले. त्यांनी मदासुराला हसत हसत सांगण्यास आरंभ केला, हे दैत्येंद्रा! माझे वचन ऐक. सुखप्रद असा सल्ला मी तुला देत आहे. तू सोडून दिलेल्या देवतांनी वनात जाऊन तपस्या केली. त्या आराधनेने भगवान श्रीस्वानंदेश गणेशांना प्रसन्न करून घेतले. ते निर्गुण निराकार परब्रह्म त्यांच्या उपासनाबले सगुण साकार झाले. तो ब्रह्मणस्पती वरदानार्थ आला असता त्या सगळ्यांनी तुझ्या वधाची मागणी केली. भगवान तपस्येने प्रसन्न होऊन होकार देते झाले आहेत. अत: आता तो भगवान श्रीएकदंत तुला वधण्यार्थ येथे येणार आहे. त्यावेळी सावध रहा. आणि खरे तर त्याला शरण जा. हाच एकमेव पर्याय तुझ्याजवळ अवशिष्ट आहे. अन्यथा तुझा राज्यनाश, असुर हानी आणि तुझा विनाश अनिवार्य आहे.

नारदांची वचने ऐकली आणि राक्षस चक्क मूर्च्छित पडला. दुष्टांची हीच अवस्था असते. वरून ते कितीही बढाया मारत असले तरी आतून अत्यंतिक घाबरट असतात. विजय काळात जोरजोरात आरोळ्या ठोकणारी त्यांची वृत्ती पराजयाच्या केवळ संकल्पनेने, शक्यतेनेही थरारून जाते. सगळे धैर्य सोडून जाते. पराक्रम जणू गोठतो. मदासुराचेही तसेच झाले. तो मूर्च्छित झाला. थोड्या वेळाने उठला आणि एकान्तात जाऊन दु:ख करू लागला. पण काही वेळानंतर आत्मसमाधान करण्यासाठी त्याची मनोदेवता त्याला सांगू लागली. अरे! घाबरतोस कशाला? या ब्रह्मांडात असणाऱ्या कोणत्याही गोष्टीपासून तुला भय नाही. पंचमहाभूतात्मक कशानेही तुला मृत्यू नाही. मग घाबरण्याचे कारण काय? हा कोण एकदंत आहे? तो तुला कसा मारणार? त्यालाच आता मी मारून टाकीन.

मदासुर विचार करू लागला. 'त्याचवेळी माझे चुकले. उगाच त्या सर्व देवतांना सोडून दिले. त्रिपुरासुर म्हणत होता तेच बरोबर होते. देव हे शेवटी वेदानुसार असुरांचे शत्रूच ठरले. त्यांना सोडल्यानेच ही अशी वेळ आली आहे.'

असा विचार करून शेवटी त्याने देवता विनाशाचा निर्णय घेतला आणि अंमलबजावणीसाठी समस्त दैत्यसैन्याला पाचारण करून आक्रमणाचा आदेश दिला. सगळे सैन्य नवउत्साहाने सळसळत आक्रमणार्थ सज्ज झाले. आणि आगेकुच करणार इतक्यात अद्भुत चमत्कार घडला. त्या सैन्यात अतिविराटरूपात भगवान श्रीएकदंत अचानक प्रगट झाले. अतुलनीय शक्तिधारी असे ते प्रतापी रूप दर्शनक्षणीच दैत्यांना भयकारक असे होते. ते मूषकारूढ तथा नर-नागमय अर्थात मानवी धड तथा नाग म्हणजे हत्तीचे मस्तक असे रूप पाहिले आणि दैत्य परमविस्मयचकित झाले: आणि मग एकच कोलाहल माजला. कोणालाच कळेना हे आहेत तरी कोण?

त्या प्रकाराने हबकलेल्या दैत्यराजाने सैन्याला शांत राहण्यास सांगून दूताला आज्ञा दिली- जा! आणि हे कोण आहेत त्याबाबत सामोपचाराने माहिती घेऊन ये. दैत्यदूत

भगवान श्रीएकदंतांसमोर आला. प्रणाम करून म्हणाला- मी मदासुर नामक ब्रह्मांडाधिपती असुरसम्राटाचा दूत आहे. आपणास पाहून विस्मित झालेल्या त्याने मला पाठविले आहे. आपण कोण आहात? कुठून आला आहात? कशासाठी आला आहात? तथा आपले नाव काय? आपण कोणत्या पक्षाचे आहात? हे सर्व संशय दूर करून घेण्यासाठी त्याने मला आपणाकडे पाठविले आहे.

दैत्यदूताचे वचन ऐकले आणि मग हसून भगवान श्रीएकदंत त्याला सांगू लागले- हे दैत्यदूता! मी स्वानंदवासी आहे. तेथून सध्या मदासुर हननार्थ येथे या रूपात आलो आहे. देवांची सुखवृद्धी करण्यासाठी आलेल्या मला सर्वजण एकदंत नावाने भजतात. हे दूता, तू परत जा! आपल्या त्या राजाला मदासुराला सांग की, हे मूर्खा! जर जगण्याची इच्छा असेल तर तात्काळ मला शरण ये. देवतांचा द्वेष सोडून दे. त्यांची जबरदस्तीने बळकावलेली स्वर्गादि स्थाने त्यांना परत करून सरळ पाताळाचा रस्ता धर. तेथे जाऊन शांतपणे रहा. देवतांना यज्ञयागातील हविर्भाग अर्थात आहूतीरूपी अन्न सुखाने मिळू दे. दैत्य पाताळात पाताळाचे भोग शांतपणे भोगतील. देवता स्वर्गात. त्यामुळे समस्त विश्व स्वधर्मरत होईल. त्यासाठीच मी आलो आहे. सत्यधर्माचा रक्षक रूपात प्रगट झालो आहे. त्याला हा माझा संदेश सविस्तर सांग. आणि साम संदेश उत्तर रूपात शरण येण्याचा सल्ला दे. अन्यथा, मी त्याचा वध करीन हेही समजावून सांग.

श्रीएकदंताचे ते वचन ऐकले. दूताने त्यांना प्रणाम केला आणि परत जाऊन सर्व वृत्तान्त मदासुरास कथन केला. त्या दैत्याच्या मुखातून ती मृत्यूच्या शक्यतेची वार्ता ऐकली आणि मरणाला अत्यंतिक घाबरणाऱ्यांचा सम्राट असणारा तो मदासुर पुनश्च मूर्च्छित पडला. दैत्यांनी मोठ्या प्रयासाने त्याला पुनरपि शुद्धीवर आणले.

सावध झाल्यावरही तो पुनश्च शोक करू लागला. नारदांनी जे सांगितले, तेच या दूतानेही सांगितले आहे. याचा अर्थ नारद खरे सांगत होते. आता हा एकदंत निश्चितच मला मारेल. अशा रूपात शोक करत होता आणि त्याच वेळ क्रोधसंतप्तही होत होता. स्वत:चीच समजूत घालत म्हणत होता. मी आता त्या एकदंतालाच मारून टाकतो. नानाविध अस्त्र शस्त्रांनी त्याचा वध करतो. मी काळाचा काळ आहे. मला कशाचे भय आहे? मी अवध्य आहे.

असे बरळत तो सरळ युद्धभूमीवर आला आणि आल्या आल्या त्याने एक अतिभयानक उग्र शस्त्र श्रीएकदंतांवर फेकले. त्या शस्त्राला पाहून भगवान श्रीएकदंतांनी आपला दिव्य परशू समोर केला. त्या परशूने प्रथम ते शस्त्र गिळंकृत केले आणि मग त्यातून जो कोटिसूर्य समप्रभ प्रकाश पसरला तो पाहणेही दैत्यांना असंभव झाले. मग त्यावर उपाय वा लढणे तर फार पुढची बाब. परशूच्या तेजाने दैत्यहननास प्रारंभ केला.

त्या परब्रह्मस्वरूप हत्याराच्या प्रभावाने त्रिपुरादिक राक्षस केव्हाच रणांगण सोडून पळाले. एकटा मदासुरच समोर उरला. त्याने मात्र प्राणपणाने लढाईचा निश्चय केला. धैर्य एकवटून तो त्वेषाने चालून गेला. श्रीएकदंतावर सोडण्यासाठी 'संहार' नामक अस्त्र वापरावे म्हणून त्याने धनुष्य हाती घेतले. मात्र बाण लावण्या वा मंत्रप्रयोग करण्यापूर्वीच त्या परशूने दैत्यराजाच्या छातीवर प्रहार केला आणि महावादळाने उभा वृक्ष तुटून पडावा तसा मदासुर धारातीर्थी पडला. अर्धाप्रहर तो बेशुद्ध होता. त्यानंतर पुनरपि जागृतीत आला आणि तरीही समोर ते परमतेजस्वी अस्त्र उभेच होते. त्याने त्या परशुला पकडण्याचा प्रयास केला. मात्र हात नुसतेच आकाशातून फिरले. वारंवार प्रयत्न करूनही हाती काहीच लागत नव्हते. परशु दिसत होता पण हात आरपार जात होते. आणि मग त्या तपस्वी राक्षसराजाच्या लक्षात आले की हे सामान्य अस्त्र नाही. हे परब्रह्माचेच अंशरूप असल्याने तेही परब्रह्मरूपच आहे. अवयवहीन आहे. जगतातील मायेतील जडतेने रहित असल्याकारणानेच ते स्पर्श अवस्थेच्या अतीत आहे. शुद्ध चैतन्य रूप असल्याने अनुभवता येत असले तरी धरणे शक्य होणारे नाही.

असा विचार मनात आला आणि मग दुसरी भूमिका ज्ञात झाली. जर हे शस्त्र इतके असामान्य असेल तर मग हा एकदंत सामान्य कसा असेल? याचा अर्थच हे साक्षात् परब्रह्मच आहे. नारदांनी सांगितलेले सत्यच आहे. दूताने मांडलेलेही सत्यच आहे. हे एकदंत साक्षात् स्वानंदनाथच आहेत. यांच्यासह लढणे निरर्थकच नव्हे तर मूर्खत्वाचे आहे. माझ्या वरदानांचा येथे कवडी उपयोग नाही. मला ब्रह्मांडातील बाबींनी धोका नाही. हा ब्रह्मांडाच्याही अतीत आहे. यांच्या रोमारोमात अनंतब्रह्मांडे विलसत आहेत. मला पंचमहाभूतात्मका पासून मृत्यू नाही. हे गणनाथ महाभूतांच्या पार आहेत. महाभूते मायेची कार्ये आहेत. हे तर मायेच्या अतीत आहेत. अत: शरणागतीच योग्य आहे.

**मनात शरणागतीचा विचार आला आणि मग गणराजकृपे त्याला तो एकदन्तत्वाचा अर्थही उमगला. सत्व, रज आणि तम अशा तीन गुणांची जी एकत्रित साम्यावस्था त्या प्रकृतीला, मायेला एका असे म्हणतात. अर्थात त्या मायेच्या ठिकाणी हे तीन गुण समान रूपात असतात. तीन पणा नसतो या अर्थाने तिला एका असे म्हणतात. विश्वनिर्मिती प्रक्रियेची सुरुवात या अर्थाने पहिले प्रगटीकरण रूपातही तिला 'एक' म्हणतात. त्या मायेचा संचालक, शास्ता, अधिपती जो पुष्टिपती त्यालाच एकदंत असे म्हणतात. असा दिव्य अर्थ गणनाथकृपे त्याला अवगत झाला.**

मग माया ही भ्रान्तिकारी आहे. तिची सत्ता कितीही अगाध असली तरी जगताच्या क्षेत्रात आहे. त्यामुळेच आदिशक्तीने मला पंचमहाभूतात्मका पासून अभयाचे वरदान दिले. कारण ती पंचमहाभूतांची स्वामिनी आहे. मात्र हे भगवान एकदंत त्या मायेचेच अधिपती

आहेत. यांच्यापाशी जगतातील, मायेतील वरदान सत्ता काय चालणार. हे साक्षात् परब्रह्म आहेत. आणि माझे परमभाग्य आहे की आज अनायासे हे निर्गुण निराकार तत्व माझ्यासमोर साकारले आहे. विनासायास मला ते भाग्य मिळाले ज्यासाठी शुकादिक मुनी अखंड योगसाधना करीत राहतात. हा सिद्धिरमण, बुद्धिनायक मला दिसला. माझ्या भाग्याला पारावार नाही.

मनात अशा रीतीने भक्तिरसाचा प्रवाह वाहू लागला आणि मग परम आनंदित झालेल्या मदासुराच्या मनीचा अहंकाररूपी अंधार एकदंतीय प्रकाशात विरघळला आणि मदासुर भगवान श्रीस्वानंदेशांना शरण आला.



